सन २०१८-१९ मध्ये वनतळे / सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम या राज्य योजनेअंतर्गत विविध वनवृत्तांमध्ये वनतळे / सिमेंट बंधाऱ्याचे बांधकामाचा नवीन बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : साववि २०१८/प्र.क्र.१०७ /फ-११**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**

**दिनांक :- ३१.०१.२०१९**

**वाचा** :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५.०१.२०१९

२) शासन निर्णय , महसूल व वन विभाग क्रमाक एफडीएम-२०१८/प्र.क्र.६१/फ-२, दिनांक १८.०६.२०१८.

३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २४.१०.२०१८

४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २३.०१.२०१९

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म. रा., नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२८/१९०८/२०१८-१९,दि.२३.०१.२०१९

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म. रा., नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२८/१९०९/२०१८-१९,दि.२३.०१.२०१९

६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म. रा., नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२८/१९०७/२०१८-१९,दि.२३.०१.२०१९

७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म. रा., नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२८/०७९७/१९२८/२०१८-१९,दि.२५.०१.२०१९

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये वनतळे/सिमेंट बंधा-याचे बांधकाम करणे (४४०६०७९७) या योजनेकरिता रु.११००.०० लक्ष इतका निधी मंजूर व अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी संदर्भ क्र.२ ,३ व ४ येथील शासन निर्णयान्वये एकूण **रु.४३३.३१ लक्ष** ( ०२- मजूरी- रु. ३२१.४४ लक्ष व २१- पुरवठा सामग्री रु. १११.८७ लक्ष ) **निधी वनतळे/ सिमेंट बंधाऱ्याची कामे करण्याकरिता वितरित** करण्यात आलेला आहे. वित्त विभागाने संदर्भ क्र.१ अन्वये नमूद केलेल्या दि. २५.०१२०१९ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पित निधीच्या खर्चाची मर्यादा भांडवली लेख्यातील कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबींवर १०० % एवढी विहित केली आहे.

आता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४,५,६ व ७ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार अनुक्रमे गडचिरोली,यवतमाळ, औरंगाबाद व अमरावती या वनवृत्तातील साठवण तलाव / खोदतळी कामे

करण्या करिता खालीलप्रमाणे एकूण रु. ३७९.२६ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

| अ. क्र | वनवृत्त | कामांचे स्वरुप | रक्कम ( रु.लाखात ) |
|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | वनतळे सिमेंट बंधारे बांधकाम | १२५.७२ |
| २ | यवतमाळ | वनतळे सिमेंट बंधारे बांधकाम | १०१.०१ |
| ३ | औरंगाबाद | वनतळे सिमेंट बंधारे बांधकाम | १०२.१९ |
| ४ | अमरावती | वनतळे सिमेंट बंधारे बांधकाम | ५०.३४ |
| | | **एकूणं** | **३७९.२६** |

**शासन निर्णय :-**

"वनतळे / सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६०७९७)" या योजनांतर्गत योजनेकरिता अर्थसंकल्पित असलेल्या निधीपैकी प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे गडचिरोली,यवतमाळ, औरंगाबाद व अमरावती या वनवृत्तातील साठवण तलाव / खोदतळी कामे करण्या करिता एकूण **रु.३७९.२६ लक्ष** निधी वितरीत **(०२ मजुरी - रु.३०३.४० लक्ष व २१-पुरवठा व सामग्री- रु. ७५.८६ लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास, सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल या अटीच्या अधिन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत कामे निश्चित करावीत. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखील दक्षता घ्यावी.

३. सदर योजनेवर होणारा खर्च खाली नमूद लेखा शिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

मागणी क्र.सी-१०,
प्रधान शीर्ष - ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,
(०१) वनीकरण, ०७० दळणवळण व इमारती पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,
राज्य योजनांतर्गत योजना, (००)(०३) वनतळयांचे बांधकाम (४४०६०७९७)

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.०२.०४.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११७३८३३१२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

CHANDRASHEK
HAR D TARANGE

Digitally signed by CHANDRASHEKHAR D TARANGE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=fb8c9383a2159ef0954b8bea7a4de7769b9a2308eccebd89cbd1dd3f1964f665, postalCode=400032, street=REVENUE AND FOREST,MADAM CAMA ROAD,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=58ec18904b2f9beed6623c280f52b95e697b2a942aea9b3167f26447ae26a806, ou=REVENUE AND FOREST , o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=CHANDRASHEKHAR D TARANGE
Date: 2019.01.31 17:52:01 +05'30'

**( चंद्रशेखर तरंगे )**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), गडचिरोली,यवतमाळ, औरंगाबाद व अमरावती
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-६) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती, फ-११,कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.